**अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांचा परिवीक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांक- इएसटी-१०१९/प्र.क्र.१८/का.१४२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
६ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २० ऑगस्ट, २०२०

**वाचा:-** १) नियोजन विभाग, शासन आदेश क्रमांक: नामनि-१२१५/प्र.क्र.११८/ का.१४२७, दिनांक ३०/०१/२०१६.
२) अर्थ व सांख्यिकी संचालनालयाचे पत्र क्र.परिवि-१४१७/गट-ब (राज)/ ७५/भाग-३/प्रशा-२/१७५, दिनांक १०/०२/२०२०.

**कार्यालयीन आदेश :**

नियोजन विभागाचे संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशान्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील पदावर ३७ अधिकाऱ्यांची नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली असून सदरहू नियुक्ती आदेशात संबंधित अधिकारी दोन वर्षे परिविक्षा कालावधीवर राहतील, असे नमूद करण्यात आलेले आहे. सदर उमेदवारांना नियुक्ती आदेशात नमूद केल्याप्रमाणे, दोन वर्षांच्या कालावधीत विहित विभागीय परीक्षा (जर काही असल्यास) आणि संगणक हाताळणी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक होते. तसेच, हिंदी व मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे किंवा त्यातून सूट मिळणे आवश्यक होते. तसेच सदरहु दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीत परिविक्षा अधिकाऱ्यांनी जर रजा उपभोगलेली असेल; तर त्या रजेच्या कालावधीएवढा परिविक्षा कालावधी शासन परिपत्रक क्र.५३४६/४६, दिनांक २६ ऑगस्ट, १९५२ नुसार वाढविणे आवश्यक आहे.

२. नियोजन विभागाचे संदर्भाधिन आदेश क्रमांक १ अन्वये "संशोधन अधिकारी / सांख्यिकी अधिकारी, गट-ब (राजपत्रित)" संवर्गात नियुक्त करण्यात आलेल्या श्री.तोरवणे निर्मलकुमार रमाकांत, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास) यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या आहेत.

३. अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये श्री.तोरवणे निर्मलकुमार रमाकांत, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास) यांनी परिविक्षा कालावधीमध्ये अर्जित/ परावर्तीत अशा प्रकारची रजा उपभोगली नाही.

४. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन श्री.तोरवणे निर्मलकुमार रमाकांत, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास) यांचा परिविक्षाधिन कालावधी या परिच्छेदातील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्रमांक ४ मध्ये नमूद दिनांकास (म.नं.) समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ क्रमांक ५ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ.क्र. | परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचे नांव | नियुक्ती दिनांक | परिविक्षा कालावधी संपुष्टात आल्याचा दिनांक | संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी पदावरील सेवा नियमितपणे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.तोरवणे निर्मलकुमार रमाकांत | २३/०२/२०१६ | २२/०२/२०१८ | २३/०२/२०१८ |

५. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवि-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार सदर कार्यालयीन आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

६. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर कार्यालयीन आदेश उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८२०१६०५४१८५१६ असा आहे. हा कार्यालयीन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6dd848a31422ed36ba4503d4744b6dc20833c851baba ce12b16b7bba3f67cca2, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2020.08.20 16:31:31 +05'30'

**( तु. पु. हिर्लेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती
३. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती
४. श्री.निर्मलकुमार रमाकांत तोरवणे (मार्फत:- अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)
५. निवड नस्ती.